**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास प्रवासी करातील ५.५ टक्के रक्कम भांडवली अंशदान म्हणून समायोजित करण्यास मंजूरी देण्याबाबत (ऑक्टोबर, २०१४ ते मार्च, २०१५).**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-०३१५/प्र.क्र. १७५/परि-१,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

दिनांक : २७ मार्च, २०१५.

<u>वाचा</u>

1) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी ३४००/६३१/सीआर-३१/परि-१, दिनांक २० जून, २०००.
2) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाचे पत्र क्र.राप/ लेखा/ अंववि/६३६, दिनांक ११ मार्च, २०१५.
3) शासन निर्णय क्रमांक एसटीसी-०११५/प्र.क्र.२५/परि-१, दिनांक २०.०३.२०१५.

<u>प्रस्तावना</u>

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाला प्रवासी कराची रक्कम १७.५ टक्के या दराने शासनास अदा करावी लागते. महामंडळाने प्रवासी कराच्या १२.०० टक्के प्रमाणे येणारी प्रवासी कराची रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित ५.५ टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास देण्यात यावी, असे आदेश संदर्भाधिन दि.२०.६.२००० च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील एप्रिल, २०१४ ते सप्टेंबर, २०१४ या सहा महिन्याच्या कालावधीतील रु.१४६.३७ कोटी प्रवासी कराचे भांडवली अंशदान म्हणून समायोजन करण्याचे आदेश संदर्भाधिन क्रमांक ३ येथील दिनांक २०.०३.२०१५ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानंतर सन २०१४-१५ आर्थिक वर्षातील उर्वरित कालावधीतील ५.५ % प्रवासी कराचे भांडवली अंशदान म्हणून समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

सन २०१४-१५ मधील ऑक्टोबर, २०१४ ते मार्च, २०१५ या सहा महिन्याच्या कालावधीतील ५.५ % दराने प्रवासी कराची अनुज्ञेय रक्कम रु. १३९,६७,८९,७५५/- (अक्षरी रुपये एकशे एकोणचाळीस कोटी सदुसष्ट लाख एकोणनव्वद हजार सातशे पंचावन्न फक्त) शासनाचे भांडवली अंशदान म्हणून महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास समायोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम गृह विभाग मागणी क्रमांक बी-१०, ५०५५- मार्ग परिवहन यावरील भांडवली खर्च (००) १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाला भागभांडवली अंशदान, (योजनेतर) (५०५५ ००११) ३२ अंशदाने या

लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने खर्च दाखविण्यात यावी व लेखाशिर्ष "००४२ मालावरील व उतारुवरील कर -१०६- कर वसुली (००४२ ००६२) (०१) (०२)" उतारुवरील करापासून मिळालेल्या जमा रक्कमा या खाली पुस्तकी समायोजनाने प्रवासी कराची रक्कम जमा दाखविण्यात यावी. सदर समायोजन २०१४-१५ या वर्षाकरिता करण्यात यावे.

३. वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन करण्याची कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७०/१५/व्यय-८, दि.२७.०३.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३११५५०३६१५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash K Sabale

Digitally signed by Prakash K Sabale
DN: CN = Prakash K Sabale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.31 16:00:27 +05'30'

(**प्रकाश साबळे**)
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रत**,

१. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
३. महाव्यवस्थापक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
४. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
९. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१०.संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, मुंबई
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-१०), मंत्रालय, मुंबई
१३. गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती/कार्यासन परि-१.